उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांसाठी निधी मंजुरीबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१६/३७३/प्र.क्र.५३/र-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २८/०८/२०१८

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थसंकल्प-३, दि.१८/०४/२०१७
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं-२०१६/३७३/प्र.क्र.५३/र-८, दि. २४/०८/२०१६
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं-२०१६/३७३/प्र.क्र.५३/र-८, दि. २६/०३/२०१८
७) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, यांचे पत्र क्र. भीकामं/लेशा/२४६९/सन २०१८, दि. २२/०५/२०१८
८) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र. अर्थसं-२०१६/३७३/प्र.क्र.५३/र-८, दि. २७/०६/२०१८
९) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांचे पत्र क्र. उकावि.८/ ले.३/ ५२२६, दि. २१/०७/२०१८

प्रस्तावना -

उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेअंतर्गत पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांकरिता आवश्यक त्या कारणमिमांसेशिवाय निधी मागणी प्रस्ताव अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी संदर्भाधिन क्र. ७ येथील पत्रान्वये सादर केला होता. तदनंतर निधी मागणी प्रस्ताव उचित कारणमिमांसेसह तसेच उपस्थित अन्य बाबींच्या पुर्ततेसह सादर करणेबाबत संदर्भाधिन शासन पत्र क्र. ८ अन्वये कळविण्यात आले होते. त्यास अनुसरुन, कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी संदर्भाधिन क्र. ९ येथील पत्रान्वये उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी रु. १०३.५७ लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे.

२. त्यानुसार विचाराधिन पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांना त्यांच्या स्वीकृत निविदा रकमेपेक्षा अधिक मागणीच्या अनुषंगाने, कार्यक्षेत्रावर क्षेत्रिय परिस्थितीनूसार कामामध्ये वाढ झाली असल्याने स्वीकृत निविदेपेक्षा अधिक निधी आवश्यक असल्याबाबत प्रकल्पयंत्रणेने दिलेली कारणमिमांसा लक्षात घेऊन, प्रस्तुत

निधी मागणी ही कामांवरील प्रशासकीय मान्यता रक्कम मर्यादेत असल्याने नमूद नागरी सुविधा कामांसाठी मागणीप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

त्यानुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांसाठी रू. १,०३,५७,०००/- निधी सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु. १,०३,५७,०००/- (रुपये एक कोटी तीन लक्ष सत्तावन्न हजार फक्त ) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) (कार्यक्रमावरील खर्च)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, नाशिक यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, नाशिक यांनी या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, नाशिक यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत तसेच तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, नाशिक व संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

(७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

(८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

(९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

(१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

(११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

(१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१२५४२७७५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.08.28 12:59:56 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), नाशिक विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक

३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अहमदनगर
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर
७. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *

**शासन निर्णय क्र. अर्थसं-२०१६/३७३/प्र.क्र.५३/र-८, दि. २८/०८/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.**

| अ. क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १) | आवटेवाडी | सिमेंट कॉंक्रीट गटार | ४५,०६,०००/- |
| २) | आवटेवाडी | ग्रामपंचायत कार्यालय | ६,८८,०००/- |
| ३) | शिंपोरा | सिमेंट कॉंक्रीट गटार | ४४,७५,०००/- |
| ४) | शिंपोरा | ग्रामपंचायत कार्यालय | ६,८८,०००/- |
| | | **एकूण** | **१,०३,५७,०००/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.08.28 13:00:26 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**